अनधिकृत बांधकामे/अतिक्रमण निमूर्लनासाठी
नव्याने समर्पित यंत्रणा निर्माण करण्यासाठी
आवश्यक पदे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

शासन निर्णय क्र. पीसीसी-३०१४/प्र.क्र.४१३/नवि-२२

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

**दिनांक :- ३०** ऑगस्ट, **२०१४**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र. कंडोंमपा-१००६/प्र.क्र. १९२/२००६/नवि-२८, दिनांक २ मार्च,२००९

२) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. दवनि/६/कावि/६५/२०१४, दिनांक २१.७.२०१४ व पत्र क्रमांक दवनि/६/कावि/७४/२०१४,दिनांक २०.८.२०१४

प्रस्तावना :-

राज्यातील नागरी भागात अनधिकृत बांधकाम/अतिक्रमण नियंत्रण व निर्मुलनासाठी उपाययोजना करण्यासंबंधात संदर्भाधिन दिनांक २ मार्च,२००९ च्या शासन निर्णयान्वये तरतुदी विहित केल्या आहेत. तसेच श्रीमती जयश्री एस. डांगे यांनी मा. उच्च न्यायालयात दाखल केलेली जनहित याचिका क्रमांक २०७/२०१० मध्ये मा. न्यायालयाने दिनांक ५.५.२०१४ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, महानगरपालिका हद्दीतील अनधिकृत बांधकाम/अतिक्रमण निमूर्लनासाठी विविध संवर्गात एकूण १५५ अतिरिक्त पदे निर्माण करण्यास महापालिका सभा ठराव क्रमांक ५५६, दिनांक १९.८.२०१४ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदर पद निर्मितीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५१ (४) अन्वये शासन मान्याता देण्यासाठीचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांनी संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २०.८.२०१४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्याअनुषंगाने महापालिका सभेने मान्य केलेल्या ठरावानुसार तसेच आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,पिंपरी यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील मुद्दे व पदांची आवश्यकता विचारात घेऊन, विविध संवर्गातील १५५ पदांच्या निर्मितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्दीतील अनधिकृत बांधकाम/ अतिक्रमण निमूर्लनासाठी खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे ४ संवर्गात एकूण १५५ नविन पदे व त्याअनुषंगाने सदर पदांना देय वेतनश्रेणीस (वेतनबँड/ ग्रेड वेतन) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५१ (४) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ. क्र. | पदनाम | वेतनबँड/<br>ग्रेड वेतन | नव्याने निर्माण<br>करावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता | वेतनबँड रूपये १५६००-३९१००<br>ग्रेड वेतन रूपये ६६०० | २ |
| २ | उप अभियंता | वेतनबँड रूपये १५६००-३९१००<br>ग्रेड वेतन रूपये ५४०० | १९ |
| ३ | कनिष्ठ अभियंता | वेतनबँड रू.९३००-३४८००<br>ग्रेड वेतन रूपये ४६०० | ६२ |
| ४ | बीट निरीक्षक/स्थापत्य<br>अभियांत्रिकी सहाय्यक | वेतनबँड रूपये ५२००-२०२००<br>ग्रेड वेतन रूपये २८०० | ७२ |
| | | **एकूण पदे** | १५५ |

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांनी सर्व संबंधित बाबींची पूर्तता करुन विहित कार्यपद्धतीनुसार नियुक्तीची कार्यवाही पूर्ण करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८३०१५५२१९२४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावांने व आदेशानुसार,**

Prabhakarrao Baburao Pawar

Digitally signed by Prabhakarrao Baburao Pawar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakarrao Baburao Pawar
Date: 2014.08.30 15:52:28 +05'30'

**( प्रभाकर पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई -३२
२) अपर मुख्य प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
४) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
५) निवड नस्ती (नवि-२२)